पशुधन उत्पादकता वृद्धी कार्यक्रम

जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत "चारा उत्पादन कार्यक्रम"

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-जिवाओ-२०२४/ प्र.क्र ३०/ पदुम-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :- २० मे, २०२५

वाचा- १. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक एफडीआर- २०२३ / प्र.क्र.३९ / पदुम-४, दि. २१.०६.२०२३

२. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक-डीएएचडी-१४०१२/१/२०२३-एच-४ (ई- ६६५०८०), दि.१८.१०.२०२३

**प्रस्तावना :-**

वाचा क्र. १ येथील शासन निर्णय दि. २१.०६.२०२३ अन्वये जिल्हा वार्षिक सर्वसाधारण योजनेअंतर्गत "वैरण व पशुखाद्य कार्यक्रम" राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर कार्यक्रमामध्ये पुढील उपघटकांचा समावेश आहे-

१. शेतकऱ्यांच्या शेतावर वैरण उत्पादनासाठी प्रोत्साहनपर वैरण बियाणे वाटप
२. विशेष पशुधन उत्पादन कार्यक्रमांतर्गत संकरित/ देशी गोवंशाच्या कालवडी, सुधारित/ देशी पारड्यांची जोपासना करण्यासाठी अर्थसहाय्य
३. मुरघास निर्मितीस प्रोत्साहन देणे अंतर्गत सायलेज बॅग खरेदीसाठी ५० टक्के अनुदान
४. मुरघास वापरासाठी कमाल २ दुधाळ पशुधनासाठी ३३ अनुदान
५. टिएमआर (टोटल मिक्स्ड रेशन) वापरासाठी कमाल २ दुधाळ पशुधनासाठी प्रोत्साहनपर ३३ टक्के अनुदान
६. खनिज मिश्रण वापरासाठी कमाल २ दुधाळ पशुधनाकरिता प्रोत्साहनपर ३३ टक्के अनुदान

अस्तित्वात असलेल्या योजनांच्या परिणामकारकतेत वाढ होऊन त्यांचा जास्तीत जास्त लाभ लाभार्थ्यांना व्हावा, या दृष्टिकोनातून योजनांचे सुनियोजन व सुसूत्रीकरण करण्याचे निर्देश केंद्र शासनाने दिले आहेत.

शासन निर्णय क्रमांक एफडीआर-२०२३/प्र.क्र.३९/पदुम-४, दि.२१.०६.२०२३ अन्वये जिल्हा वार्षिक सर्वसाधारण योजनेअंतर्गत वैरण व पशुखाद्य कार्यक्रमाअंतर्गत समावेश असलेल्या उपरोक्त ६ उपघटकांपैकी क्र.३ ते ६ येथील उपघटकान्वये देण्यात येणारे अनुदान हे त्रोटक स्वरूपाचे असल्याने त्याचा पुरेसा लाभ पशुपालकांना होत नसल्यामुळे योजनेस अपेक्षित यश प्राप्त झाले नाही. त्यामुळे ४ उपघटकांना देण्यात येणारे अनुदान हे अनुत्पादक ठरते, ही बाब विचारात घेऊन वैरण व पशुखाद्य कार्यक्रमाअंतर्गत समावेश असलेले ४ उपघटक वगळणे आवश्यक ठरते.

शासन निर्णय क्रमांक एफडीआर-२०२३/प्र.क्र.३९/पदुम-४, दि.२१.०६.२०२३ मधील उपघटक क्र.१ मधील वैरण बियाण्यांची अनुदान मर्यादा शासन निर्णय दि. १८.१०.२०२३ अन्वये प्रति एकर प्रति लाभार्थी रु.१५००/- वरून प्रति हेक्टर प्रति लाभार्थी रु.४०००/- करण्यात आली आहे.

राज्यातील सन २०२२-२३ या वर्षातील गायी-म्हशींचे सरासरी प्रतिदिन दूध उत्पादन फक्त ५.५ लिटर इतके असून पशुपालनात अग्रेसर असलेल्या पंजाब राज्यातील गायी-म्हशींचे सरासरी प्रतिदिन दूध उत्पादन सरासरी १० लिटरपेक्षा जास्त आहे. राज्यातील पशुधनास त्यांची उत्पादन क्षमता टिकवून ठेवणे/ उत्पादन क्षमता वाढविण्यासाठी आवश्यकतेनुसार हिरवा व वाळलेला चारा दैनंदिन आहारात देणे आवश्यक आहे.

राज्याची अर्थव्यवस्था सन २०२८ पर्यंत १ ट्रिलीयन अमेरीकन डॉलर करण्याचे उद्दिष्ट साध्य करण्यामध्ये "जिल्हा" हा विकासाचा महत्वाचा घटक आहे. त्यामुळे सदर उद्दिष्ट साध्य करण्यासाठी जिल्हा हा घटक पायाभूत मानून "जिल्हा विकास आराखडा" तयार केला आहे. "जिल्हा वार्षिक योजनेत" मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या किमान २५ टक्के रक्कम जिल्हा विकास आराखड्यात नमूद असलेल्या विविध कार्यक्रम/ योजना/ प्रकल्प यासाठी खर्च करण्यास मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली आहे. जिल्हा विकास आराखड्यात पशुसवंर्धन विभागाचा समावेश प्राधान्य क्षेत्रात (Priority Sector) करण्यात आला आहे.

राज्यातील एकूण पशुधनाची संख्या व सरासरी इतक्या होणाऱ्या पर्जन्यकाळात उत्पादित होणारा वैरण व चारा यांचा एकत्रित विचार केला असता सुमारे ४४ टक्के इतकी चाऱ्याची तूट भासते. सरासरीपेक्षा कमी पर्जन्यमान झाल्यास चारा उपलब्धतेची परिस्थिती आणखी बिकट होते.

उपरोक्त पार्श्वभूमीवर या विभागाचा शासन निर्णय दि.२१.०६.२०२३ अन्वये जिल्हा वार्षिक सर्वसाधारण योजनेअंतर्गत वैरण व पशुखाद्य कार्यक्रमाअंतर्गत समावेश असलेल्या ६ उपघटकांपैकी क्र. ३ ते ६ येथील उपघटक वगळण्याची तसेच उपघटक क्र.१ मधील वैरण बियाण्यांची अनुदान मर्यादेबाबतचा शासन निर्णय दि. १८.१०.२०२३ रद्द करुन "शेतकऱ्यांच्या शेतावर वैरण उत्पादनासाठी प्रोत्साहनपर वैरण बियाणे वाटप" या उपघटकांसाठी स्वतंत्र व स्वयंस्पष्ट शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

दूध उत्पादन वाढीसाठी दुधाळ पशुधनास पुरेशा प्रमाणात व पौष्टिक चारा देणे ही प्राथमिक गरज आहे. दुधाचे उत्पादन वाढविण्यासाठी चाऱ्याची तूट कमी करणे हा योजनेचा मुख्य भाग असून पशुधनास पुरेशा प्रमाणात पौष्टिक चारा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने पशुपालकांना चारा उत्पादनाकडे आकर्षित करण्यासाठी सध्या अमंलबजावणी करण्यात येत असलेल्या "वैरण व पशुखाद्य कार्यक्रम" या कार्यक्रमात सुधारणा करण्यासाठी वाचा क्र. २ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच वाचा क्र. १ येथील शासन निर्णयातील अनु क्र. ३ ते ६ येथील उपघटक वगळून अनुक्रमांक १ येथील "शेतकऱ्यांच्या शेतावर वैरण उत्पादनासाठी प्रोत्साहनपर वैरण बियाणे वाटप" ऐवजी **"चारा उत्पादन कार्यक्रम"** हा सुधारित कार्यक्रम सन २०२५-२६ पासून सन २०२८-२०२९ या कालावधीत राबविण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

### २. योजनेचे स्वरुप-

प्रति लाभार्थी १ हेक्टरच्या क्षेत्रात वैरण उत्पादन घेण्यासाठी १०० टक्के अनुदानावर रु. ४०००/- (अक्षरी रु. चार हजार मात्र) च्या मर्यादेत वैरणींच्या बियाण्यांचा / ठोबांचा पुरवठा करण्यात येईल..

### ३. अटी / शर्ती

१. ज्या लाभार्थ्यांकडे भारत पशुधन प्रणाली किंवा केंद्र सरकारने वेळोवेळी निर्देशित केलेल्या प्रणालीवर नोंद असलेली स्वत:ची किमान ३ ते ४ जनावरे आहेत, अशा लाभार्थ्यांस प्राधान्य
२. वैरण बियाण्यांचा पुरवठा करताना लाभार्थ्यांकडे उत्पादनासाठी स्वत:ची शेतजमीन व सिंचनाची सुविधा उपलब्ध असणे आवश्यक.
३. वैरणीच्या उत्पादनासाठी आवश्यक खते, जिवाणू संवर्धके शेतकऱ्याने स्व: खर्चाने खरेदी करणे आवश्यक.
४. सर्व प्रवर्गातील शेतकऱ्यांना लाभ घेण्यास पात्र.
५. एका लाभार्थीस एका आर्थिक वर्षात एकदाच लाभ अनुज्ञेय.

### ४. कार्यक्रम अमंलबजावणी कार्यपद्धती

१ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद/जिल्हा पशुसवंर्धन उप आयुक्त लाभार्थ्यांकडून ऑनलाईन पद्धतीने अर्ज मागवतील.
२ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद/जिल्हा पशुसवंर्धन उप आयुक्त उपलब्ध निधीच्या अधीन राहून लाभार्थ्यांची निवड करतील .

३ या कार्यक्रमांतर्गत ज्वारी, मका, बाजरी, बरसीम, लसूणघास, न्युट्रीफिड व इतर बियाणे तसेच नेपियर व इतर सुधारित बहुवर्षीय गवत प्रजातीची ठोंबांचे वाटप करण्यात येतील .

४ वैरणीची बियाणे व ठोंबांची खरेदी राष्ट्रीय बियाणे महामंडळ, राज्य बियाणे महामंडळ (महाबीज), इतर शासकीय संस्था, कृषि विद्यापिठे, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळांतर्गतची प्रक्षेत्रे, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळांतर्गतची प्रक्षेत्रे, यांच्याकडून करण्यात यावी.

५ वैरण बियाण्यांचे वाटप करण्यापूर्वी लाभार्थ्यांना वैरण पिकांच्या लागवडीबाबत तांत्रिक मार्गदर्शन करण्यात यावे.

६ वैरण बियाणे वाटप करताना हंगामानुसार वैरण पिकांची निवड करण्यात यावी.

७ सक्षम प्राधिकारी यांची सदर योजनेंतर्गत निधी वितरणासाठी तांत्रिक व प्रशासकीय मंजुरी घेण्यात यावी.

८ संबंधित जिल्ह्याचे जिल्हा पशुसंवर्धन उप आयुक्त हे योजना अंमलबजावणी अधिकारी व योजनेचे आहरण व संवितरण अधिकारी असतील.

९ प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त हे विभागीय तर राज्यस्तरावर आयुक्त पशुसंवर्धन हे सनियंत्रण अधिकारी असतील.

१० सदर कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या वैरण बियाण्यांपासून जिल्ह्यात चारा उत्पादन होऊन पशुधनाची उत्पादकता वाढीस लागेल आणि चारा टंचाई उद्भवणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

११ या कार्यक्रमांतर्गत लागवड करण्यात आलेल्या चारा पिकांच्या क्षेत्राचे लाभार्थी निहाय भूमी-अंकन (जीओ टॅग) छायाचित्र जिल्हा पशुसंवर्धन उप आयुक्त कार्यालयात ठेवण्यात यावे.

१२ या योजनेअंतर्गत २४०३-पशुसंवर्धन, २१-सामग्री व पुरवठा या उद्दिष्टांखाली संबंधित जिल्हा नियोजन समितीकडे निधीची मागणी प्रस्तावित करण्यात यावी.

५. हा शासन निर्णय नियोजन विभागाने दि. ०६.०८.२०२४ च्या टिपण्णी अन्वये दिलेली मान्यता तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ५६१/२०२४/व्यय-२, दि. २१.०३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक २०२५०५२०१४३६०६१६०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2025.05.20 14:36:56 +05'30'

**(नि. भा. मराळे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत-**

१ मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२ मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३ मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४ प्रधान सचिव (वित्त विभाग-व्यय), मंत्रालय, मुंबई
५ प्रधान सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई
६ आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
७ सर्व विभागीय आयुक्त
८ सर्व जिल्हाधिकारी
९ सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१० मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर.
११ सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन,
१२ प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१३ प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१४ मा.मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१५ विभागीय व्यवस्थापक, गोठित रेत प्रयोगशाळा, पुणे, नागपूर व औरंगाबाद (हर्सुल)
१६ सर्व जिल्हा पशुसंवर्धन उप आयुक्त,
१७ सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८ निवड नस्ती (पदुम-४).